अधीक्षक अभियंता (यांत्रिकी) या पदावर पदोन्नतीने पदस्थापना.

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन आदेश क्रमांकः एसएलएस-१२१६/(४३४/२०१६)/आ.(वर्ग-१)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
**तारीख: १७ जुन, २०१७.**

वाचा:- सामान्य प्रशासन विभागाचे पत्र क्र.ईएसबी-१११७/प्र.क्र.३४/१३, दि.१२.०५.२०१७.

**शासन आदेश :-**

जलसंपदा विभागातील पुढील कार्यकारी अभियंता (यांत्रिकी) यांना अधीक्षक अभियंता (यांत्रिकी) या पदावर रुपये १५६००-३९१०० श्रेणीवेतन (Grade pay) रु.७६०० या वेतनश्रेणीत संदर्भीय दि.१२.०५.२०१७ च्या पत्रान्वये आस्थापना मंडळाने शिफारस केल्यानुसार **तदर्थ स्वरुपात** पदोन्नती देण्यात येत आहे.

१. श्री.मिलिंद महादेव मोरे (अ.जा.) (ज्ये.क्र.१०)

२. श्री.विलास एकनाथ गायकवाड (अ.जा.) (ज्ये.क्र.१२)

२. वर नमूद अधिकाऱ्यांना खालील अटींच्या अधीन राहून तदर्थ पदोन्नती देण्यात येत आहे :-

१) सदर पदोन्नती ही तदर्थ व मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे प्रलंबित असलेल्या रिट याचिका क्र.२७९७/२०१५ (स्टॅम्प क्र.७२५६/२०१५) (महाराष्ट्र राज्य विरुध्द श्री.विजय घोगरे व इतर) तसेच संलग्न इतर न्यायालयीन प्रकरणामध्ये होणाऱ्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहतील.

२) सदर पदोन्नती ही मा.महारष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ नागपूर येथे प्रलंबित असलेल्या मूळ अर्ज क्र.७९०/२०१६ व मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ औरंगाबाद येथे प्रलंबित असलेल्या मूळ अर्ज क्र.५८/२०१७ मधील अंतिम निर्णयाच्या अधीन राहील.

३) सदर पदोन्नती महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा वर्ग-१ व वर्ग-२ (ज्येष्ठता विनियम व ज्येष्ठता यादीची सुधारणा) नियम, १९८३ अन्वये सुधारित होणाऱ्या कार्यकारी अभियंता (यांत्रिकी) यांच्या ज्येष्ठतेच्या अधीन राहील.

४) त्यांना देण्यात आलेली ही पदोन्नती कोणतीही पूर्वसूचना वा नोटीस न देता रद्द करण्याचा अधिकार शासन राखून ठेवीत आहे.

३. पदोन्नत झालेल्या वरील अधिकाऱ्यांची पदोन्नतीने नियुक्ती सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोईच्या दृष्टीने पुढीलप्रमाणे करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव (सर्वश्री.) | सध्या धारण करीत असलेले पद | पदोन्नतीने नियुक्तीचे पद | अभिप्राय |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | मिलिंद महादेव मोरे | कार्यकारी अभियंता, ताकारी यांत्रिकी व विद्युत विभाग, सांगली. | अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ, नाशिक. | रिक्त पदी. |
| २. | विलास एकनाथ गायकवाड | कार्यकारी अभियंता, मुख्य द्वार उभारणी पथक क्र.३, स्वारगेट पुणे. | उप संचालक, आरोग्य सेवा (परिवहन), सार्वजनिक आरोग्य विभाग, पुणे. | रिक्त पदी. |

४. संबंधीत वरिष्ठ अधिकाऱ्यांनी वरील पदोन्नत अधिकाऱ्यांना पदोन्नतीच्या पदावर रुजू होण्याकरिता तात्काळ कार्यमुक्त करावे. तसेच, पदोन्नत अधिकाऱ्यांना पदोन्नतीने नियुक्तीच्या पदावर हजर होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते नियुक्तीच्या ठिकाणी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत शासनास doesttclass1.wrd@maharashtra.gov.in या ई-मेल आयडीवर त्वरीत अवगत करावे.

५. पदोन्नत झालेल्या अधिकाऱ्यांनी अधीक्षक अभियंता (यांत्रिकी) या पदाचा कार्यभार ग्रहण केल्यावर वेतननिश्चितीचा विकल्प तात्काळ द्यावा. असा विकल्प न दिल्यास त्यांची वेतननिश्चिती महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियमावली १९८१ मधील नियम क्रमांक ११(१)(ए) नुसार पदोन्नतीचा दिनांक विचारात घेऊन, करण्यात यावी.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०१७०६१७१११५५२८५२७** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vijay K. Chaudhari

Digitally signed by Vijay K. Chaudhari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce26368b8badbee9e69852845f0a, cn=Vijay K. Chaudhari
Date: 2017.06.17 16:10:18 +05'30'

**(वि.का.चौधरी)**
शासनाचे अवर सचिव

प्रत,

१) मा.राज्यपाल महोदयांचे सचिव.
२) मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव.
३) प्रधान सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) प्रधान सचिव (जलसंपदा)/ सचिव (जलसंपदा व्यवस्थापन व लाक्षेवि) / सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) सर्व महासंचालक/कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग.

७) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र जलसंधारण महामंडळ, औरंगाबाद.
८) सर्व मुख्य अभियंता व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई .
९) सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
१०) मुख्य अभियंता (यांत्रिकी), जलसंपदा विभाग, नाशिक.
११) सर्व अधीक्षक अभियंता (यांत्रिकी), जलसंपदा विभाग.
१२) महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता), १-मुंबई / २-नागपूर.
१३) संबंधीत अधिकारी.
१४) संबंधीत जिल्हा कोषागार अधिकारी.
१५) खाजगी सचिव, मा. मंत्री (जलसंपदा), मंत्रालय, मुंबई.
१६) खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री (जलसंपदा),मंत्रालय, मुंबई
१७) उप सचिव (का.१६-ब), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८) उप सचिव (का.१३), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९) सर्व कार्यासने जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई .
२०) कार्यासन आ (वर्ग-१), संग्रहार्थ.